सत्कार्योत्तेजक सभा - धुळे.

( स्थापना- १८१५ जेष्ठ शुद्ध ४ )

श्री

रामदास आणि रामदासी

भाग एकसष्टावा

# श्री रामदासी संशोधन



## चतुर्थ खंड

## प्राकृत हस्तलिखितांचा



ग्रन्थसामग्री जो करी ।
तो सत्वगुण ॥



संपादक- शिवाजी नरहर भावे



राजशक २८२ ज्येष्ठ शुद्ध प्रतिपदा १

तारीख ३-६-१९५५



किंमत- ४ रूपये

# प्रस्तावना

समर्थ भक्त, श्री. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं सुमारें ६० वर्षांपूर्वी धुळयास सत्कार्योत्तेजक सभा नांवाची संस्था स्थापन केल्यावर प्रथम समर्थांचे कार्य हातीं घेतलें. श्रीरामदास स्वामी यांचे व त्यांच्या शिष्यांचे जेवढे महाराष्ट्रांत मठ होते तेथें जाऊन त्यांनीं मठांच्या परिस्थितीचें निरीक्षण केलें. तेव्हां त्यांस असें आढळून आले कीं, बहुतकरून प्रत्येक मठांत मौल्यवान ग्रंथांची बाडें ठेवलेलीं असून त्यांची उधईमुळें व पावसाच्या पाण्याच्या गळण्यामुळें, नासाडी होत आहे. महाराष्ट्र हळू हळू या मौलिक संग्रहाला पारखा होईल असें जाणून मठांतील ग्रंथांचा, बाडांचा, पोथ्यांचा कागदपत्रांचा मिळेल तितका संग्रह हस्तगत करून तो सुरक्षित स्थळीं ठेऊन पुढील नाशापासून वाचवावा या हेतूनें त्यांनीं कांहीं संग्रह धुळयास आणला. त्याची दप्तरें सोडून पहातां त्यांत अनेक बहुमोल ग्रंथ, जे अद्यापपर्यंत प्रसिद्ध झाले नाहींत असे त्यांस आढळले. तेव्हां अशा या ग्रंथसंपत्तीची महाराष्ट्रास माहिती करून द्यावी म्हणून, त्यांनीं, "रामदास रामदासी" नांवाचे मासिक सुरु करून हळू हळू त्या ग्रंथांचीं प्रसिद्धी चालविली. एखाद्या सुरक्षित व अदाह्य अशा इमारतींत त्यांची शिस्तवार मांडणी करून, तो ग्रंथ संग्रह जनतेच्या उपयोगासाठीं खुला ठेवावा. म्हणून "श्री वाग्देवता मंदिर" नांवाची सुमारें पंधरा हजार रुपयांची दगडी इमारत बांधून, त्यांत लोखंडी कपाटांतून त्या ग्रंथांची शिस्तवार मांडणी केली, व अभ्यासकांस सुलभ जावें म्हणून त्या ग्रंथांची सूचि तयार केली. प्रथमचः १ ते ५३६ इतक्या बाडांकाची एक सूचि तयार करून त्याला "रामदासी संशोधन प्रथम खंड" असे नांव दिलें. हे ५३६ ग्रंथ याप्रमाणें जनतेच्या पुढें व्यवस्थेशीर मांडल्या नंतर सुद्धां बरेच ग्रंथ शिल्लक राहिले होते. त्यांचा दुसरा खंड काढणें जरूर झालें आणि तसा एक दुसरा खंड प्रसिद्ध करून त्यांत बाडांक ५३७ ते १८७५ इतक्या ग्रंथांचा समावेश करून व विस्तृत सूची जाडून तोही प्रसिद्ध केला. हे

दोन्ही खंड मिळून १८७१ प्राकृत बाडें प्रसिद्ध झाल्यानंतर पुणें येथील साकुर्डीकर दिक्षीत यांच्याकडील संस्कृत ग्रंथांचा संग्रह, सत्कार्योत्तेजक सभेस मिळाला. मागील दोन खंडाप्रमाणें, या संस्कृत ग्रंथांचे संशोधन करून व सूची तयार करून, एक तिसरा "रामदासी संशोधन तृतीय खंड संस्कृत हस्तलिखितांचा" अशा नांवानें प्रसिद्ध करण्यात आला. यांत १ ते ८६३ अशा अनुक्रमानें संस्कृत बाडांची यादी दिलेली आहे.

या तीन खंडांमिळून, झालेलें, एकंदर २७३८ ग्रंथ वाग्देवता मंदिराच्या लोखंडी कपाटांत स्थानापन्न झाल्यावरसुद्धां श्री.नानासाहेबांकडे आलेल्या ( १ ) श्री. लाड साहेब, यांचे मार्फत आलेलें अदिवागचे दप्तर, ( २ ) वाळवे वझीर, यांचे दप्तर, ( ३ ) कारंजे येथील दप्तर, अशा दप्तरांतून भरलेलें असे कागदपत्र, जुनी बाडें, प्राकृत कविता संग्रह, असा बराच संग्रह, अद्याप तपासून, त्यांचे संशोधन होऊन वरील ग्रंथांत तो सामील व्हावयाचा राहिला होता. त्याचें संशोधनाचे व सूचीचें काम पुरें करून आतां हा प्राकृत ग्रंथांचा म्हणून चौथा खंड ( या मागील मराठी ग्रंथांचे दोन खंड १८७५ पर्यंतच्या ग्रंथांचे झाले होते ) त्याच्या पुढील १८७६ क्रमांक देऊन एकंदर आणखी ४११ ग्रंथांचा खंड काढला आहे. याला रामदासी संशोधन "चतुर्थखंड" असें नांव दिले आहे.

याप्रमाणें आतां वाग्देवता मंदिरांत संस्कृत प्राकृत मिळून एकूण ३१४९ ग्रंथ सुरक्षितपणें व सुव्यवस्थितपणें विद्यमान आहे व जनतेला त्याचा उपयोग करतां यावा म्हणून त्यांची सुचीहि तयार झालेली आहे. जनतेनें या सोईचा, वाग्देवता मंदिराच्या नियमांस अनुसरून यथास्थित उपयोग करून घ्यावा अशी अपेक्षा आहे.

या चौथ्या खंडांतही, पूर्वीच्या खंडाप्रमाणेंच अनेक बहुमोल ग्रंथ समाविष्ट झालेले आहेत. हें नुसत्या सूचीवरून नजर फिरविल्यास लक्षांत येईल.

## ३१. नेने दप्तर १ [ अलीबाग ] लाडमार्फत

**१८७६ ] १ कुवलयानंद भावार्थ कौमुदी टीका [ १५०**

कुवलयानंद भावार्थ कौमुदी टीका पत्रें १ ते १०४ संपूर्ण ग्रंथ मराठींत संस्कृत श्लोकावर टीका आहे. अलंकार शास्त्रावर ग्रंथ आहे. अक्षर चांगलें आहे. आकार १२"×४" शक वगैरे नाहीं.

**१८७७ ] २ कुवलयानंद भावार्थ कौमुदी टीका [ १५०**

ही वरीलप्रमाणेंच पोथी आहे पण मुख्य श्लोक निराळे दाखविले आहेत. टीका मराठींत आहे. समग्र अक्षर सुंदर व ठसठशीत आहे पत्रें १ ते १८१ आहेत. व्यंकटपतीच्या आज्ञेवरून अप्पदीक्षित यांची कृती. आकार १२"×५"

**१८७८ ] ३ मोरोपंताची कविता [ ६०**

आदिपर्व, उद्योगपर्व, गदापर्व, सभापर्व मुक्तामणिमाळा यावरील आर्या कोणी उतरल्या आहेत. गिरणींतला कागद आहे अलीकडील ५०।६० वर्षांतील. आकार ६" × ९"

**१८७९ ] ४ हिंदुस्थानी दोहे [ ५०**

हे दोहे २५० आहेत. त्याचा मराठींत अर्थ दिला आहे. केशव बाजी परचुरेकर वेळेकर यांची सतसई आहे. वचनें बोधपर आहेत. पृष्ठें ६२ आहेत.

**१८८० ] ५ रामार्या [ ९०**

मुग्दल विरचित रामचंद्र आर्या १०८ सटीक शके १७८०

१८८१ ] ६ रसायण करण्याचें बाड [ ६०

काहीं रंग रसायणें, मेणकापड, दारूकाम वगैरे करण्याच्या कृति आहेत. १४ पानें

१८८२ ] ७ बाड पदांचें [ १००

नाथभुजंग, सुरदास, रंगराव, माधव, अमृतेश्वर मानपुरी, जयरामजजांकित,इत्यादींची देवांचीं व इतर पदें तालासह आहेत. अक्षर सुंदर आहे शेवटल्या पानांची शाई, अक्षरें वाचतां येत नाहींत इतकी फिकी झाली आहे. पत्रें २१ ते ६० आहेत. पहिलीं वीस नाहींत.

१८८३ ] आख्यानाचें बाड [ १००

वामन कवीचीं अनेक आख्यानें यांत उतरलेलीं आहेत. नृहरी-दर्पण जयद्रथ वध (श्रीधर) द्रौपदी स्वयंवर, वामन चरित्र, रामजन्म, कृष्णजन्म, गरुडाख्यान, गणपतीचें आख्यान, अजामिलाख्यान, अशीं आहेत. कांहीं संकीर्ण पदेंहि आहेत. सुमारें ५५ पानें.

१८८४ ] ९ रसरत्नाकर [ ७५

औषधी रसायणें करण्याची संस्कृत पोथी पानें १२

१० हरिवासाख्य महाकाव्य

कोलिबराज विरचित संस्कृत प्रबंध, रासक्रीडा ऋतुसंहार वगैरे खंडकाव्यें पत्रें ३ ते २९ अपूर्ण. शक नाहीं.

१८८५ ] समश्लोकी'अपरोक्षानुभूतीची वामनकृत [ ७५

वामन पंडितांची समश्लोकी मूळ व अर्थाचे मराठी श्लोक २४ ते १४६ पानें ५ ते २३ मधील ६ पासून १० पर्यंत पत्रें नाहींत त्यामुळें ३६ ते ६१ श्लोक नाहींत. शक नाहीं अक्षर उत्तम आहे कागद गिरणीचा.

१८८६ ] १२ परभूच्याबद्दल पोथ्या २ [ १२५

शाहूराजांच्या कारकीर्दीत परभू मंडळींनीं आपणांस ब्राह्मणा-प्रमाणें श्रुति स्मृति पुराणोक्त अशीं वैदिक कर्मे करण्याचा अधिकार असावा, अशाबद्दल काशीक्षेत्रीं खटपट केली त्याबद्दलची संस्कृतांत हकीकत आहे पोथ्या जुन्या आहेत निरनिराळया लेखकांच्या आहेत. एक पोथी १३ पानांची चंपावतीस्थ याजुषोपाध्याय फडके मनोहरोपाह्व भट्ट जनार्दनात्मज विनायकेनलिखितं दुसऱ्या पोथीचे लेखक अगर काळ याचा उल्लेख नाहीं. शके १६७१ त हें प्रकरण झालेलें दिसतें.

१८८७ ] १३ संकीर्ण बाड [ १२५

यांत पदें बरींच आहेत. अमृतरायाचे सुदाम चरित्राचे, शुक चरित्राचे, असे कटाव आहेत. नाथ भुजंगाची ताकबद्ध पदें आहेत अक्षर चांगलें ठळक आहे पत्रें १ ते १०२ आहेत. कागद जुना आहे.

१८८७ ] १४ दप्तरांतील गळाठा [

## नेने दप्तर २

१८८८ ] १ अपरोक्षानुभूति [ १२५

वामन पंडितांची मराठी समश्लोकी पत्रे ३१ ठळक स्पष्ट ठसठशित अक्षर सुंदर ( शिवराम स्वामी टीकायां ) असेंहि म्हटलें आहे पोथी जुनी दिसते आकार १२"×५"

१८८९ ] २ स्वात्मसुख [ १२५

एकनाथांचा ग्रंथ पोथी फार सुंदर लिहिली आहे. पत्रें १ ते २३ संपूर्ण ग्रंथ आहे. पोथीचा आकार १२"×४"

१८९० ] ३ वाक्यसुधा [ ७५

आचार्यांच्या वाक्यसुधेवर समश्लोकी मराठी टीका महेश्वर-विरचित पत्रें १-३० अक्षर फार सुंदर आकार १०"x५॥"

१८९१ ] ४ कर्णसुधा [ १५०

हें एक सुंदर संस्कृत काव्य आहे. कृष्णाचे चरित्रावर श्लोक रचलेले आहेत. श्लोकांची रचना विद्वत्तादर्शक आहे. एकदर १११ श्लोक आहेत. मासल्याकरितां एक श्लोकः—

प्रभुः शैलोदारी चटुच्चतर नारी जनमनो। विनोदव्याहारी मुदिररुचिधारी मुररिपुः॥ मुदेक व्यापारी जगद वनकारी हृदिचिरं चमत्कारी हारी व्रजविहारी विहरतु॥१६९॥

पोथीचें शेवटीं उल्लेख आहे तोः— श्रीमद्गंगाधर प्रियनंदन चंद्रचुडोपाव्हय यशवंतराय विरचिता श्रीमत्कर्णसुधा समाप्त. आकार ११"x४" जोड पत्रें ७

१८९२ ] ५ श्रीकृष्ण भक्ति चंद्रिका नाटक [ १६३

संस्कृत नाटक— श्रीमत् आपदेव सूनु नानंत देवेन कृतम्। शके १७०७ चैत्र शु॥ १० ला लेखन समाप्ति. शैव व वैष्णव अशीं दोन पात्रें. शिव व विष्णु यांची एकाची दुसऱ्यापेक्षा श्रेष्ठता ठरवूं पाहतात. त्यांचे भांडण होतें. तेथें वैय्याकरणी, नैय्यायिक, मीमांसक, तार्किक वगैरे पात्रें येऊन, कोणी विष्णुचा कोणी शिवाचा अभिमान धरून वाद करतात, एकमेकांचे उणें काढतात. अखेर विष्णुचें श्रेष्ठत्व कबुल करतात. पत्रें ७ पहिलीं नाहींत. ८ ते ४० पत्रें आहेत. आकार ८॥"x४" पोथीचा कागद फार जीर्ण झाला आहे. बहुतेक भाग श्लोक-बद्ध आहे. भाषणांत विनोद आहे. स्त्रीपात्र एकहि नाहीं.

१८९३ ] ६ वैद्य विलास [ १००

संस्कृत पोथी वैद्यकाची, पत्रें ३३ मनोहर उपनायक रघुनाथ पंडित विरचित संपूर्ण.

१८९४ ] ६ विष्णुसहस्रनाम व्याख्या [ १५०

वेदांती महादेवकृत व्याख्या पत्रें ४४ संस्कृत पोथी. अक्षर बारीक. संपूर्ण आहे. आकार ६॥"×४" जुनी आहे.

१८९५ ] ८ कृष्ण स्तव [ १५०

मथुरेश्वरकृत कृष्णस्तव संस्कृत ११० प्रासबद्ध श्लोकाची पोथी पहिले ३७ श्लोक नाहींत. पोथी एका बाजूनें लिहिली आहे. जुनी जीर्ण. श्लोक चांगले. आकार ८"×४" पत्रें ९

१८९६ ] ९ पदपदांतरांचें बाड [ १२५

यांत बरीचशी वामन पंडितांची कविता आहे. नानाप्रकारचे श्लोक पदें आख्यानें आहेत.

१८९७ ] १० हकीकत वाका [

हेमाद्रिपंडित यांस- सेवक मनाजी पुरुषोत्तम यानी सृष्टि उत्पत्तीपासुन आजपर्यंतचा ( शके अजमासें १७५० पर्यंतचा ) अनुक्रम लिहून विदित केला आहे. यांत फुलस्कॅप आकाराचीं अर्धीं पानें दोन्हीकडून लिहिलेलीं अशीं सुमारें १२५ आहेत अक्षर सुंदर ढोबळ मोडी वळणदार आहे. हिंदुस्थानचे सुभे त्यांचा महसूल, अधिकारी, सूर्यवंशांतल्या व चंद्रवंशांतील राजांची वंशावळ व किती वर्षें कोणी राज्य केलें याचीं वर्षें महिने व दिवस पर्यंतची कालगणना आहे. मोगलराज्य, मराठीराज्य, पेशवाई याचींहि माहिती आहे. राजनीती दंडनीतीचे नियम आहेत. सारथी, धर्माधिकारी, धनुर्धारी, लेखक आचारी सभासद, वैद्य, आचार्य, अश्वाध्यक्ष, शिल्पी, धनाध्यक्ष, मंत्री, सेनानी,

द्वारपाल वगैरेंच्या गुणांचा तपशील दिला आहे. एकंदरीत पूर्व इतिहासच आहे व शिवाय शिकण्यासारखें यांत पुष्कळ आहे

१८९८ ] ११ महावाक्य विवरणम् [ १५०

चारी वेदांच्या चार महावाक्यांवर संस्कृत टीका आहे एकंदर १२ सिद्धांत आहेत व त्याला " द्वादश महावाक्य " विवरण असें नांव दिलें आहे. ग्रंथ फार चांगला आहे एकंदर ३४ पत्रें आहेत अक्षर ठसठशीत सुंदर आहे. कोणी केला याचा उल्लेख नाहीं. आकार १०"×५"

१८९९ ] १२ अनुभूतिप्रकाश [ १५०

सुंदर अक्षराची संस्कृत पोथी. अनुभूति प्रकाशाचे २०२ श्लोक आहेत. पत्रें १ ते ९ संपूर्ण. विद्यारण्याच्या अनुभूतिप्रकाशाचा कांहीं भाग असावा असें वाटतें ९"×४".

१९०० ] १३ रामकृष्ण चित्रकाव्य [ १६०

हें एक सुंदर काव्य संस्कृतांत केलेलें आहे. २८ श्लोक आहेत. या श्लोकांत श्लेष साधून प्रत्येक श्लोक रामाकडे व कृष्णाकडे हि लावतां येतो. कसे अर्थ होतात याचे संस्कृत स्पष्टीकरण आहे. पत्रें १ ते २७ संपूर्ण शके १७११ मार्ग. व. ९ रामचंद्रोाव्य लिखित शेवटीं " दैवज्ञ पंडित सूर्य विराचितं रामकृष्ण काव्य संपूर्णम् " असें आहे. आकार ८"×४"

१९०१ ] १०एक संस्कृत बाड वेदान्तपर [ ७५

पहिले १२ पानावर शेषोक्त आर्या ८५ आहेत. संपूर्ण आहे. पुढें ३८ पानांवर शंकराचार्यांची बालबोधिनी व ज्ञानबोधिनी उतरली आहे. त्यानंतर शंकराचार्यांच्या दश श्लोकींवर संस्कृत टीका १७ पानें

आहे. पोथीचें अक्षर फार सुंदर आहे. याला "सिद्धांत बिंदु" असें नांव आहे. हे सर्व भाग फार थोर योग्यतेचे आहेत. बाड शिवलेलें आहे. आकार ६"×८"

१९०२ ] १५ राजव्यवहार कोशाचीं पत्रें [ २००

शिवाजी महाराजांनीं जो राजव्यवहार कोश करविला त्याचीं अगदीं जीर्ण झालेलीं अशीं १२ पानें यांत आहेत. अपूर्ण आहे.

१९०३ ] नेने दप्तर २ गळाठ्याचें [

यांत (१) जांबुळ आख्यान (२) मौजे वडे, ता॥ ब्राह्मणगाव प्रांत चेऊळ येथील भटास दिले, त्या सनदांच्या नकला ३) अमृतराय यांचा संसार दुःखावरील कटाव (४) गोपीगीत, सामराज टीका (५) मोरोपंतांच्या आर्यांचे सुटे कागद (६) व्याधाचें शिवपूजेचें आख्यान वगैरे कागद आहेत. सलग असे कांहीं नाहीं.

१९०४ ] हरिविलास महाकाव्य [२५०

पृष्ठ ३ ते २९ अपूर्ण पोथी. पृष्ठ ८ वर "इति श्री कुलालंकार श्री हरिहर महाराजाधिराजो लोलिंबराज विरचित हरि विलासाख्ये महाकाव्ये रासक्रीडावर्णनं नाम द्वितीयः सर्गः समाप्तिपकाण" असा सर्गाचा शेवट आहे.

## वाळवे डबीर दप्तर

१९०५ ] १ रुक्मिणी स्वयंवर [ १९६

नाथांचें रुक्मिणी स्वयंवराची पोथी अध्याय १८ संपूर्ण शके १६७६ भावानाम संवत्सरे आश्विन वद्य २ गुरुवासरे हरिनंदनेन लिखित्वा. अक्षर चांगलें स्पष्ट आहे. आकार ८"×५"

१९०६ ] २ रुक्मिणी स्वयंवर [ १५०

नाथांचें पोथी १८ अध्याय १० व्या अध्यायाचें शेवटील पान नाहीं. फाटलेलें त्याच्या पूर्वीचें फाटलेलें पान तसेंच ठेवून एका नव्या कागदावर त्या पानाच्या ओंव्या उतरून ठेवलेल्या आहेत. शके १७२१ आश्विन शु. १ अक्षर चांगलें ठसठशित आहे. आकार ६॥"×४॥"

१९०७ ] विवेकसिंधु– मुकुंदराजाचा [ १८५

पोथी प्रकरणें १८ संपूर्ण यांत प्रारंभीच ज्ञानेश्वरायनमः ह्मटलें आहे ते लेखकाच्या पदरचें असावें प्रकरणाचे आकडे १ ते १८ असें क्रमवार आहेत. शके १६७८ व्ययनाम संवत्सर. मार्ग. कृष्ण १३ सौमवारे सत्रावें प्रकरण ३८ ओंव्यांचें आहे. सातवे प्रकरणाच्या शेवटीं आठव्या प्रकरणाच्या सुरवातीस अगर ग्रंथ समाप्ती करतांना इतर पोथ्यांतून जे संस्कृतश्लोक आढळतात तसा एकहि या पोथींत नाहीं. कागद जाडा अक्षर ठसठशित चांगले आहे. आकार ८"×४"

## वाळवे दप्तर चालू

१९०८ ] ४ संकीर्ण बाड त्र्यंबकदासाचें [ १०५

ही एक उभ्या कागदाची मध्यें शिवलेली वही सुमारें ५० पानांची आहे. यांत आहिल्येचें ओवीबद्ध आख्यान सीता स्वयंवर अशीं त्र्यंबकदासानें रचलेलीं आख्यानें आहेत. अक्रुराचें गोकुळीं आगमन व कांहीं स्फुट कविता त्र्यंबकदासांची अशी यांत आहे. बाड उधळलेलें आहे. पहिलीं व शेवटचीं पानें गाहाळ झालीं आहेत आकार घडी घातलेल्या स्थितींत ७" × ४॥"

१९०९ ] ५ गुरुगीता [ १८०

पोथी पानें २० पाहिलें पान १ गाहाळ श्लोक २७ शके १६९३ खर संवत्सर अधिक आषाढ वद्य १४ गुरुवासरे कृष्णा कुकु दमती

संगमे सताह. अनंतेन लिखित्वा आकार ६"×४" अक्षर सुंदर.

१९१० ] ६ सूर्यस्तोत्र [ ७५

एक जोडपत्र श्लोक ८ अक्षर सुंदर आकार ७"×४॥"

१९११ ] ७ गंगाष्टक [ १२५

४ पत्रें अक्षर ठसटाशित वाल्मिकिता विरचित गंगाष्टकम् आकार ५"×४"

## बंध दुसर

### विष्णु रामचंद्र देशमुख यांचें

१९१२ ] १ शिवलीलामृत [ २००

पोथी श्रीधराच्या शिवलीलामृताची संपूर्ण अध्याय १ ते १४ अक्षर फार सुंदर आहे. सांप्रदाय परंपरा दिली आहे. ती अशी क्षीर-सागरस्थ गोविंद– ब्रह्मदेव– अत्रिऋषि– दत्तात्रेय– दत्तानंद– कमलानंद ब्रह्मानंद सहजानंद ( कल्याणीचे ) पूर्णानंद–महा दत्तानंद ब्रह्मानंद महराज ( नाझरेगांवी हा पिता, माता सावित्री ) श्रीधर शके १६३२ श्रीधर शके १६३२ विलंबनाम संवत्सरे फाल्गुन शु. १५ रविवार ग्रंथ समाप्त ब्रह्मकुमंडलीचे तीरीं द्वादशनाम नगरी अध्यंतग्रंथ निर्धारी तेथें चि जाला जाणिजे आकार १०×"८" अक्षराचें वळण चांगलें घटलेलें आहे.

१९१३ ] २ हरिश्चंद्राख्यान मुक्तेश्वराचें [ १५०

पोथी यांत १।२।४।५ इतकेच अध्याय आहेत. अपूर्ण. प्रत्येक अध्यायाचीं पत्रेंहि संपूर्ण नाहींत, पोथी फार विस्कळित झालेली आहे. एकंदर जोड पत्रें सुमारें ७५ आहेत. आकार ८×"६"

१११४ ] ३ शिवलीलामृत [ ७५

पोथी श्रीधराच्या शिवलीलामृताची, पत्रें विस्कळित आहेत. अध्याय १।२।४ एवढेच आहेत. त्यांत हि कांहीं पत्रें गहाळ आहेत. एकंदर जोडपत्रें ५० आहेत. अक्षर चांगलें आकार ६×"८" अपूर्ण.

१११५ ] ४ कृष्णचारित्र [ २९०

पोथी विष्णुदासकृत कृष्ण चारित्राची अपूर्ण हे विष्णुदासनामा अगर विष्णुदासदामा नव्हेत. पोथीचा लेखनकाल शके १५८२ पौष शु. १५ शार्वरी संवत्सर विठ्ठलपंतस्य सुत प्रल्हाद यांनीं लिहिले. मौजे पळुस बाबुली कुळकर्णी, अक्षर वाईट आहे. सर्व पानें नाहींत. पोथी विस्कळित. आकार ५"×७॥".

१११६ ] ५ बाड खिपलेलें [ ८०

यांत अशौच विचार, औषधी, वृद्ध चाणक्य फक ज्योतिष, सुभाषितें, असे अनेक विषय आहेत. प्रथमचीं व शेवटची पानें गाहाळ. आकार ५॥"×७॥" अनेकांचे अक्षर आहे.

१११७ ] ६ ऋग्वेद संहितेच्या पदांची पोथी [ १५०

ऋग्वेद अष्टक १।६ यांची पदें आहेत. पोथीचा कांहीं भाग विस्कटलेला आहे. शके १७१५ बाबाजी गुर्जर स्येदं पुस्तकम् सर्व पत्रें नाहींत आकार ८"×४"

१११८ ] ७ बाड संकीर्ण विषयांचें [ १५०

यांत शुकरंभासंवाद, मुचुकुंद आख्यान, कृष्णाची पदें. आचार्यांचे कृष्णाष्टक व रामाष्टक व्यंकटेशाचीं कवनें, श्रीधर स्वामीचें पद, केशवस्वामीचें पद, सीतास्वयंवर, गजेंद्रमोक्ष वामन पंडिताचें

असेंहि आहेत. कांहीं सुभाषितें आहेत. बाड जुने आहे. अनेकांचे हस्ताक्षर आहे. आकार ९''×४॥''

१९१९ ] ८ सुटे कागदांचें पुडकें [ १२५

यांत २५ सुटे कागद सबंद पाठपोट बाळबोधींत लिहिलेले व कांबट घडी केलेले एकावर एक असें रचलेले आहेत. अक्षर ढोबळ आहे. यावर सुभाषितें, भक्तांचीं चरित्रें, भागवतांतील श्लोक वामनकृत आख्यानें, शबरी आख्यान, जोतिर्लिंगमाळा दशावतारी श्लोक मोरोपंताची आर्या, अनेक कवींचीं पदें असे उतरलेले आहेत. यांत १ कागदाचा क्रम पूर्वी असावा पण कांहीं कागद गहाळ झाले व राहिलेले विस्कळित लागलेमुळें सळमिसळ झालेली आहे. घडीचा आकार साधारणपणें ९''×४॥'' आहे.

१९२० ] ९ भगवद्गीता व व्यंकटेश स्तोत्र [ १२५

व्यासदेव निरोपिता प्राकृत जाण आता झगे ज्ञानदेव । असा ज्यांचा शेवट आहे असें गीतेचे कांही अध्याय मराठी ओव्यांचे, यांचीं व व्यंकटेश स्तोत्राचीं सुटी पानें अशी आहेत. हा ज्ञानदेव कोण तो समजत नाहीं. पोथीचे अक्षर सुंदर आहे. अपूर्ण आहे. गीतेचीं पानें ८ ते २४ आहेत. यांत मधली १७।१८ नाहींत.

१९२१ ] ११ बाड लहान शिवलेले [ १२५

यांत तुकारामाचे अभंग केशव, नरहरी, नामदेव, कबीर यांचीं कवनें सुभाषितें अशीं आहेत. पानें २५ सुमारें आकार ५'' × ५'' एक समर्थांचें पद, कोणे कोणासीं रडावें । एका मागे एक जावें । ३३ वें आहे,

११ गळाठा

# साकुर्डीकर दीक्षित दप्तर

## १९२२ ] योगवासिष्ठ [ ७५

पोथी मोगरेकर रंगनाथ यांचे योग वासिष्ठ सबंद दाहा प्रकरणांचें आहे. पहिलीं ५ व शेवटलीं ४ अशीं एकाच्याच हातचीं असून मधलें सहावें दुसऱ्या कोणाच्या हातचें आहे. अक्षर चांगलें आहे. लेखक काल वगैरे माहिती नाहीं. शेवटीं ओव्या आहेत. त्या अशा:—

धारा नाम महानगरी । गोदावरीच्या दक्षिण तिरी ।
षोडष कोश भीतरी । वर्ते पुरी अति विशाळ ॥ ८७ ॥
देशदुर्ग पश्चिम तीरी । महा विशाळ गुहा गिरिकंदरी ।
तेथें अति कृपा कटाक्ष करी । पद्मक ऋषि ठेविला ॥ ८८ ॥
त्या हस्तस्पर्शाचेनि योगें । समाधी स्वयें पाया लागे ।
प्रपंचु विसरला समूळ सांग । ब्रह्मचि अंगें होऊनि ठेलों ॥ ८९ ॥
ऐसा हा रचिला ग्रंथ सागरु । पूर्णानंद स्वादाचा पूर्ण द्वारु ।
येथें कवित्व न करुनि विचारु । बोधसमुद्र आश्रावा हा ॥ ९६ ॥

आकार १२"×८"

## १९२३ ] भगवद्गीता टीका [

पोथी यांत मूळश्लोक व त्यावर मराठी ओवीबद्ध टीका आहे. १० च अध्याय आहेत. कोणाची टीका आहे त्याचा ग्रंथ अपुरा असल्यामुळें उलगडा झाला नाहीं. अक्षर सुंदर आहे. आकार १०"×५" प्रथमाध्यायाचे शेवटीं ४९ वी ओवी आहे. ती अशी: —

जे गुरुदास्यत्व करिती । तेच गीतार्थ जाणिती ।
येर इतरां नव्हे प्राप्ती । ह्मणे ज्ञानदेवे ॥ ४९ ॥

हे ज्ञानदेव कोण ? पुढें आणखी ५१ ओवी आहे.

ज्ञानदेव निवर्ती प्रसादे । गीतार्थ ज्ञानबोधे ॥
तेणें त्रिभुवन ब्रह्मानंदे । कोंदले समरस ॥ ५१ ॥

तथापि हे ज्ञानेश्वर नव्हेत हें खास. तपास लावणें अवश्य.

१९२४ ] ३ हरिविजय [ १५०

पोथी श्रीधरांच्या हरिविजयाची यांत फक्त १३ ते ३५ अध्याय आहेत. मधला २२ नाहीं. अपूर्ण आहे. अक्षर फार सुंदर घोटीव आहे. लेखनकाळ लेखक याचा पत्ता नाहीं. इतक्याच अध्यायाची मिळून जोडपत्रें १०० असावी ३६ व्या अध्यायांत ग्रंथ पूर्ण होईल असें ३५ व्याच्या अखेर ह्मटलें आहे. आकार ९" × ६"

१९२५ ] ४ विराटपर्व मुक्तेश्वराचें [ १५०

पोथी. विराटपर्वाची मुक्तेश्वरकृत यांत अध्याय १।२।३।४।५।६ ७।८ इतके च अध्याय आहेत. अक्षर सुंदर व ठसठाशित आहे. लेखनकाळ लेखक याचा उल्लेख नाहीं. आकार ६" × ८"

१९२६ ] ५ पंचोपाख्यान [ १००

पोथी. संस्कृत पंचतंत्रातल्या गोष्टींचे हे ' मऱ्हाटी ' ओवीबद्ध अवतरण आहे. कोणी विष्णुशर्मा यानें केलें आहे. मित्रभेद मित्रमेळ, कोक उलक वृत्तांत, लुब्ध प्राणाशन, परीक्षा करणें अशा ५ विषयांची आख्याने होतीं. या पोथींत प्रकरणें १।२।३ एवढीच आहेत. दुसऱ्या प्रकरणाचे १५ ते १८ पानें नाहींत. तिसऱ्या प्रकरणाचीं ५२ पत्रें च आहेत. लेखकाचा काळाचा उल्लेख नाहीं. आकार ८" × ७"

१९२७ ] ६ तुळसीदास रामायण [ २००

पोथी. यांत युद्धकांडच उतरलेलें आहे. सुरवातीचीं ३ पृष्ठें नाहींत. पोथीचे शेवटचे पानावर २०० चा आकडा आहे. पुढील पानें

नाहींत. पोथीचा काळ व लेखक याचा उल्लेख आढळत नाही. पोथीचें अक्षर चांगलें आहे. आकार ८"×४"

१९२८ ] ७ रूक्मिणी स्वयंवर [ १५०

पोथी नाथाच्या ४।५ स्वयंवराची. यांत १ ते ८ अध्याय आहेत. मधून मधून पृष्ठें गाहाळ झालेलीं आहेत. तीं सुमारें ५० पर्यंत असावींत. अपूर्ण, अक्षर चांगलें आकार ८×"३॥"

१९२९ ] ८ पांडवप्रताप [ १००

पोथी. श्रीधराच्या पांडव प्रतापाची. यांत १०,११,१२, २६,२७,२८,२९ इतकेच अध्याय आहेत व त्यांत हि कांहीं पृष्ठें गहाळ आहेत. अक्षर साधारण आकार ८॥×"६॥"

१९३० ] ९ फुटकळ बाडाचा गठ्ठा [

यांत लहान लहान स्मरण वह्या आचार्यांच्या वाक्य वृत्तीचीं कांहीं पानें, शकुनवह्या, कर्जाचे कागद, हिंदी कवनें, औषधांच्या याद्या, गीतेचीं पानें सूर्यस्तुती, शिवलीलामृताचा एक अध्याय फाटका, मल्हारी माहात्म्य, व्यंकटेशस्तोत्र पुरुषोत्तम माहात्म्य, अनेक असे निरनिराळे कागद आहेत व लहान वह्या टाचणें आहेत. वैद्यकीचे कागद हि आहेत.

१९३१ ] १० गठ्ठा एकंदर दप्तराचा

१९३२ ] १ ज्ञानदेवी [ ९२०

पोथी. संपूर्ण. शके पंधराशतें साहोत्तरी । तारणनाम संवत्सरी । एका जनार्दनें अत्यादरीं । गीता ज्ञानेश्वरी प्रती शुद्ध केली ॥ अशी शेवटीं एक ओवी आहे. लिखितं जगन्नाथ विश्वनाथ हरोळे, पूर्वी वास्तव्य

कौसडि ग्राम चांगले । सांप्रति देवगिरी समीप रव कि पुण्य स्थळ । अकारनाम महानगरी. शके १६५३ विरधकृत संवत्सर कार्तिक शु. १२ भानुदिन प्रति लेखनसमाप्ती. पोथीचें अक्षर ढोबळ. पृष्ठांचा आकार १४"×६" एकनाथानी ज्ञानेश्वरी पंधराशे बारोत्तरी शुद्ध केली, असे कुंठ ज्ञानेश्वरीच्या पोथींत असतां या पोथींत पंधराशे सवोत्तरी ( १५०६ ! ) कसें !

१९३३ ] २ ज्ञानेश्वरी [ १८६

संपूर्ण ग्रंथ. शके पंधराशतें साबोत्तरी तारणनाम संवत्सरी । एका जनार्दनें आदरी । गीता ज्ञानेश्वरी प्रती शोधिली ॥ १ ॥ अशी बोबी १८११ ओव्या १८ व्या अध्यायाच्या संपल्या आहेत. शके १६८७ पार्थिव संवत्सरी कन्हातिरीं श्री मार्तंड सन्निध । ग्रामाचें नाम कोपळे प्रसिद्ध तयेस्थळीं परम आल्हादे ग्रंथराज लिहिविला । प्रथम प्रसंगापासुनी अष्टमाशी लिहिते झाले व्यंकटराव कासी । नवमादारभ्य अष्टादशासी मनोहर भटें लिहिलें । प्रभूवर्यामाजि भाविक । कांशी लक्ष्मण धार्मिक । तयाचें असें हे पुस्तक. अक्षर सुंदर पोथी जीर्ण झाली आहे. कांहीं कोपरे कसरीनें खाल्ले आहेत.

१९३४ ] ३ अध्यात्म रामायण [ १२८

पोथी. संस्कृत संपूर्ण. शके १७४६ कार्तिक कृ० ३ लेखक. मणेर्युप नामक दामोदरेण जावदग्राम लिखितम्

१९३५ ] ४ शिवलीलामृत [ ११९

पोथी. प्राकृत. अपूर्ण. २, ३, १२, १३, १४ एवढेच अध्याय पूर्ण आहेत. बाकी ५।६ पत्रें इतर अध्यायांचीं आहेत. शके १७९७ नंदनसंवत्सर अश्विन शु० १३ रविवार. लेखक हिरामण सुखरगासिंग परदेशी, पुणें.

१९३६ ] ५ भगवद्गीता टीका [ १२९

पोथी. मराठी ओवीबद्ध टीका गीतेवर ज्ञानेश्वरकृत असें ह्मटलें आहे. ओव्या ११७२ अध्याय १८ शके १७४४ अक्षर चांगलें ठणठशीत हे ज्ञानेश्वर कोण ? आकार ६"×६"

१९३७ ] रामायण युद्धकांड कृष्णदास मुद्गलकृत [ २१२

पोथी. कृष्णदास मुद्गलांच्या युद्धकांडाची. अपूर्ण. पहिले ४० प्रसंग नाहींत. ४१ ते ७९ अखेर आहेत. लेखन समाप्त १६५१ सौम्यनाम संवत्सरे अश्विन शु॥ १ अक्षर ढोबळ स्पष्ट पण चांगलें नाहीं. लेखकानें अशुद्ध लिहिलें आहे. 'चरणीं' बद्दल 'चरनीं' असे लिहिलें आहे. मुळांत युद्धकांडाचे अखेरीस ओव्या आहेत. त्या अशाः— असो ऐसे युद्धकांड पवित्र । दशरथी श्रीरामाचें चरित्र । हे आईक विचित्र । फलश्रुती असे बहुत ॥ ३३ ॥ ते फळश्रुती वदता । विस्तारा जाईल कथा । पुढें बोलणें उत्तरकांड श्रोता । ते परिसिलें पाहिजे ॥ ३४ ॥ युद्धकांड एकनाथांनीं दीर्घायुष्याचा वर दिल्यामुळें या कवीनें पुरे केले असें ह्मणतात. वरील युद्धकांडाचा उल्लेख कसा ?

१९३८ ] ७ हरि विजय [ ११६

संपूर्ण पोथी. अक्षर एकराकी सुंदर शके १७५७ मन्मथ संवत्सर माघ कृ० ४ मंदवासरे. तद्दीनें लिखित संपूर्णम्—पंढरीहून चार योजन दूर । पश्चिमेस नाझरेनाम नगर । तेथील देश लेखक साचर । ब्रह्मानंद पूर्वाश्रमी ॥ पुढें पंढरीस जाऊन । केले सन्यास ग्रहण । त्यावरी भीमातीरीं संपूर्ण । समाधिस्त निजसुखी ॥ तो ब्रह्मानंद महाराज पिता । सावित्रीनामे माझी माता । श्रीधरें पुजुनि उभयता । हरिविजनय संपविला

१९३९ ] ८ हरिविजय [ १६१

पोथी कसरीनें बरी च खाल्ली आहे पण मजकुराचे चारहि बाजूस बरीच जागा सोडलेली असल्यामुळें मुळास फारसा धक्का लागलेला नाहीं. पहिलें पान गाहाळ बाकी संपूर्ण ३६ अध्याय. शके १७०८ पराभव सं. कार्तिक शु॥ ११ गुरुवार काका पारगांवकर यास दान दिली. रजुवात मनोहर श्री निवास दानी नंदिकेश्वर द. शु. १७७० मार्ग. व. १०

१९४० ] ९ श्रीमद्भागवतश्रीधरीटीकेसह [ १०२

प्रचंड पोथी. संपूर्ण श्रीधरी टीकेसह सुंदर अक्षर एवढा ग्रंथ एक टाकी सुंदर कागदावर फार काळजीपूर्वक उतरलेला पाहून आश्चर्य वाटतें. शके १७७१ सौम्य संवत्सर व. कृ. १२ काणे रावजी जनार्दन काणे यांनीं लिहिला. कृष्णराव जोशी याचे मालकीचा आकार १२"×७" उंची ६॥"

१९४१ ] १० ज्ञानेश्वरी [ १२५

संपूर्ण. अक्षर चांगलें. लेखकाचा शकाचा उल्लेख नाहीं.

१९४२ ] ११ हस्तामलक नाथांची टीका [ ९६

पोथी. नाथांच्या टीकेसहित. पृष्ठें २६ संपूर्ण. शके १७८७ क्रोधनाम संवत्सर माघ शु. ७ भौमवासरे तळेगांव दाभाडे परशराम आगाशे यांनीं लिहिली.

१९४३ ] १२ ब्रह्मस्तुती [ १५०

पोथी. वामन पंडितांची श्लोकबद्ध टीका भागवतांतील ब्रह्मस्तुती. दशमस्कंदांत आहे त्यावर. पत्रे १ ते १७ एकंदर १९३ श्लोक आहेत. मूळ ८ श्लोकांचे आहे. अक्षर सुंदर. पोथी जीर्ण झाली आहे.

१९४४ ] १३ आरत्यांचे बाड [

महादेव, देवी, नवग्रह, गणपतीची हिंदींत, रामाची हिंदींत अशा ५ आरत्या आहेत.

## दिक्षित दप्तर

१९४५ ] १ हरि विजय [ १५०

पोथी—अध्याय १ ते ३६ संपूर्ण अक्षर चांगले मोठे ठसठशित शेवटचे पत्र नाहीं त्यामुळें लेखक व शक आढळला नाहीं.

१९४६ ] २ मुक्तेश्वरांचीं आदि व सभापर्वें. [ १७५

पोथी—मुक्तेश्वरांच्या दोन पर्वांचीं. दोन्हीं पर्वें संपूर्ण आहेत. पानें कांहीं दुमडलीं आहेत. अक्षर ठसठशित स्वच्छ लिहिलें आहे. आदिपर्वाचे अखेर. उल्लेख. बापूजी बल्लाळ जोशी दिमत गोविंद हरी. वास्तव्य-पुणें ग्राम परोपकारार्थ लिखितं. हस्ताक्षर बापु गंगाधर वैद्य शहर अहमदानगरास्थित पुण्यग्रामे लिखितम्- शके १६९६ जयसंवत्सर. माघ कृ० ७ सोम्यं वासरे-त्रितीय प्रहरे समाप्तः सभापर्वाचे अखेर शके १६९८ दुर्मुख संवत्सर चैत्र शु. १० रविवासरे. मालक बापूजी बल्लाळ जोशी. ग्रंथ संख्या ३०००

१९४७ ] ३ सुलोचना आख्यान [ ३०२

पोथी.कृष्ण मुद्गल यांचे सुलोचना आख्यान २ प्रसंग आहेत. शके १५७१ विरोधी संवत्सर अधिक आषाढ कृ० १३ ग्रंथ संपूर्ण लेखक रामजीपंत उदमाई-लोहगांव-शेवटील ओव्या—हे अग्निपुराणीची कथा। पाहोनी सांगितली तुम्हां समस्तां। जे आइकिली वाचिली ते रघुनाथा। आवडले भक्त होतील ॥५३॥ मल्हाड म्हणो नये हा। अर्थ।

हा बोल असे गुप्तार्थ। जया रघुनाथ कृपा प्राप्त। तयासीच साध्य होये ॥ ६४ ॥ पोथी फार जीर्ण झाली आहे. हे मुद्गल कृष्णदास म्हणजे मुक्तेश्वर कीं काय ? पहिलें पान नाहीं.

१९४८ ] ४ रामायण [ २७५

पोथी. कृष्णदास मुद्गलांच्या रामायणाचें युद्धकांड. ६८ प्रसंग आहेत. सुरवातीचीं ३००।३२५ पानें गहाळ. पुढील २७५ पानें अजमासें आहेत. पानें चिकटलेलीं आहेत. पोथी जुनी झाली आहे. अपूर्ण आहे. लेखक व काळ यांचा उल्लेख नाहीं.

१९४९ ] ५ एकनाथी भागवत [ १००

मोठी पोथी. यांत पहिले दाहाच अध्यायावरील टीका आहे. पुढले अध्याय नाहींत. पानें १५" लांबीचीं व ७॥" इंच रुंदीचीं आहेत. कागद चांगला चिवट असून अक्षर मोठें व सुंदर आहे. संस्कृत श्लोक उतरण्यांत चुका केल्या आहेत. 'उपासीत' च्या ऐवजीं 'उपाशीत' असें लिहिलें आहे. 'वैष्णव्य' च्या ऐवजीं 'वैशम्य' आहे. संस्कृतांतील श्लोक तसेच्या तसेच उतरतांना अशा चुका कां व्हाव्या एका कोणा अजाणत्यानें चूक केली तीच पुढें चालली असें होत असावें.

१९५० ] ६ भगवद्गीता टीका [ २७५

पोथी. गीतेवर मराठी ओवीबद्ध टीका. पहिला, तिसरा, चवथा व बारावा इतके गाहाळ. कोण कर्ता समजत नाहीं. शेवटीं हस्ताक्षर—त्रिंबक हरी. वैशाख शु. ३ शुभकृत संवत्सर एवढाच मजकूर लिहिला आहे. अक्षर वाईट आहे. ढोबळें आहे. श्लोक उतरण्यांत फार चुका आहेत.

१९५१ ] ७ गळाढा [

# कारंजे गठ

१९५२ ] १ अमृतानुभवामृत [ ३१६

पोथी— शिवकल्याणांचा. अमृतानुभव ( ज्ञानेश्वरांचा ) यावर ओवीबद्ध टीका दहा हि प्रकरणें पूर्ण आहेत. शके १५५७ युव संवत्सर मार्ग शु. १५ ग्रंथ समाप्त झाला. ग्रंथ सुवाच्य आहे. पानाचा आकार ११"×४"

१९५३ ] २ जुनें शिवलेलें बाड [ २००

यांत अपरोक्षानुभूति (आचार्यांची) मूळ (२) उत्तर गीतेवर ज्ञानदेव कवि रचित (३) विवेकसिंधु असे तीन ग्रंथ उतरलेले आहेत. विवेक-सिंधु संपूर्ण आहे. त्याच्या ओव्या १६१९ असें छापलें आहे.

या शिवाय आचार्यांचे रामाष्टक हरिस्तोत्र अशीं आहेत. पहिलीं व शेवटलीं पानें गाहाळ.

१९५४ ] ३ अपरोक्षानुभूति [ १७५

पोथी. संस्कृत विवरण उत्तम आहे. नित्यानंद चरणानुचरेण कृतम । यथा प्रत्या रामदासानुचरेण लिखितम. काळ व लेखक यांची माहिती नाहीं. अक्षर सुंदर आहे.

१९५५ ] ४ योगवासिष्टसार [ १७०

पोथी. प्राकृत यांत ६।८।९।१० इतकेच भाग आहेत. पत्रें जीर्ण झालीं आहेत. ग्रंथ कोणाचा व कधींचा हें समजण्यास शेवटचीं पानें नसल्यामुळें साधन नाहीं.

१९५६ ] ब्रह्मसूत्रावर टीका [ १८३

पोथी संस्कृत यांत ब्रह्मसूत्राच्या चार हि अध्यायावर परमहंस परिव्राजकाचार्य श्री मत्मुकुंद गोविंद श्री चरण शिक्षित श्रीराम किंकर

धर्म कृती ब्रह्मपुत्र वृत्ती ब्रह्ममृतरर्षिंगी नावाची संस्कृत सुत्रवृत्ति आहे. ग्रंथ संपूर्ण आहे. नकलेचा शके १७०० चैत्र शु ९ अक्षर सुवाच्य शुद्ध लिहिलेले आहे. आचार्यांच्या टीके इतकी विस्तृत नाहीं.

१९५७ ] ६ युद्धकांड कृष्णदास मुद्गलकृत, [ २२२

यांत ५६ प्रसंग आहेत. संपूर्ण पोथी आहे. शके १६५१ सौम्य संवत्सर आश्विन शु. १५ लेखकाचें नांव नाहीं.

१९५८ ] ७ भागवत दशमस्कंध [ १२५

कृष्णदास मुद्गलकृत १३ अध्यायावरच कविता आहे.

१९५९ ] ८ शिवलीलामृत [ २३१

श्रीधरांचा ग्रंथ शके १६४० फाल्गुन शु. १५ रविवारीं ग्रंथ संपविला १४ अध्याय आहेत.

१९६० ] ९ अमृतानुभव [ १७५

ग्रंथाचें नुसतें मूळ आहे. संपूर्ण आहे. श्रीनिवास ब्रह्मचारी याचा केवळ एवढाच उल्लेख आहे.

१९६१ ] १० रुक्मिणी स्वयंवर [ १०९

प्रसंग १८ संपूर्ण. नाथांचें शके १७७४।१७७५ परिधावी संवत्सर आश्विन शु. ५ हरी जयराम. मोहनीराजाचे कृपें लिहिलें एकंदर ओव्या १६८२

१९६२ ] १० ग्रंथराज-दिगंबरानुचर विरचित [ १५०

पोथी. प्राकृत ग्रंथ चांगला. परंतत्वज्ञान घनामृताचा आल्हाद देणारा आहे. काळ, स्थळ, लेखक याचा उल्लेख नाहीं. हे दासोपंत की काय ?

१९६३ ] १२ विवेक सिंधु [ १७७

मुकुंदराजांचा. विवेकसिंधूची संपूर्ण पोथी. शके १७०६ क्रोधी संवत्सर आश्विन कृ. ६ सोमवार अक्षर चांगलें आहे.

१९६४ ] १३ रामगीता [ १५०

रामकोकिळ यांनी केलेली प्राकृत ओवीबद्ध गीता. पत्रें १०१ आहेत. ग्रंथ संपूर्ण आहे.

१९६५ ] १४ हस्तामलक [ ११८

पोथी. संपूर्ण आहे. शके १६३५ श्रावण श. ११ बुधवार. हस्ताक्षर. सज्जनांकित पूर्ण नामाभिधान प्रल्हाद, अशुद्ध लिहिलें आहे. 'घनच्छवें' ऐवजीं 'घनछिन्न' लिहिलें आहे.

१९६६ ] १५ अन्तर्भाव [ १२२

श्रीसमर्थांचा. त्याचीं फक्त ९ पृष्ठें आहेत. अपूर्ण.

१९६७ ] १६ त्र्यंबकेश्वर गिरी महात्म्य [ ७१

लिहिलेली पोथी. ब्रह्मांड पुराणांतले. शके १८०० चैत्र शु॥ १ अशुद्ध आहे.

१९६८ ] १७ उत्तरगीता [ २२४

ज्ञानदेवकृत. पत्रें ६१ आहेत. पोथीवर शक लिहितांना १६४ एवढेच आकडे लिहून एका आकड्याची जागा सोडून शुभसंवत्सर आश्विन कृष्ण १० असें लिहिलें आहे. संपूर्ण आहे.

१९६९ ] १८ आत्मबोध [ २६६

आचार्यांच्या आत्मबोधावर ही प्राकृत ओवीबद्ध टीका आहे. पोथीचे दोन भाग आहेत. पहिले भागांत ३१ श्लोकावरची ५६ पत्रें टीका आहे. याचा शक १६३७ मन्मथ सं. मार्ग. श॥ २ पुस्तक

ठुंजाजा केसादेंहु वास्तव्य. कारंजें यांचें. हस्ताक्षर वासुदेव दवी. दुसरे भागात बाकीचे श्लोकावर ४९ पत्रें टीका आहे. शक लेखक वगैरे वरील प्रमाणेंच सर्व आहे.

१९७० ] १९ मननग्रंथ [ १५०

मराठी ग्रंथ गद्यांत. मूळ वासुदेवेंद्र स्वामी यांनीं संस्कृतांत विवेकसार नांवाचा ग्रंथ लिहिला. त्याचें तेलंग भाषेत रघुनाथेंद्र स्वामीं यांनीं रूपांतर केलें. त्यावरून पुढें बालकृष्णानंद सरस्वती यांनीं आपले शिष्य बालाजी आबाजी रुद्रोम चे गृहस्थ यांचेकडून महाराष्ट्र ग्रंथ यथा तेलंग केला. ग्रंथ संपूर्ण आहे. पत्रें १९० आहेत. याच नांवाचा ग्रंथ राजवाडे मंडळामार्फत छापला गेला आहे. अक्षर चांगलें आहे. कालाचा लेखकाचा उल्लेख नाहीं.

१९७१ ] २० मननग्रंथ [ २२९

गद्य ग्रंथ वरीलप्रमाणें शके १६४४ शुभकृत् संवत्सर पौष शु. ७ सबंद आहे. लेखनाचा उल्लेख नाहीं.

१९७२ ] २१ मननग्रंथ [ २००

गद्य ग्रंथ वरीलप्रमाणें. शेवटीं लिखित रामदासस्य देवदासानुचारेण आनंदा एवढाच उल्लेख आहे. संपूर्ण आहे.

१९७३ ] २२ भक्तविजय [ १५०

महिपतीचा ओवीबद्ध ग्रंथ. अध्याय ५७ ग्रंथ संख्या ९६८९ हें पुस्तक माधोबा मैराळे यांचे धर्मार्थ लिहिलें असे. हस्ताक्षर रामकृष्णात्मज. दोन जन लिहिणारे दिसतात. ग्रंथ संपूर्ण नाहीं. अध्याय ३५ ते ४१ नाहींत.

१९७४ ] २३ भागवत दशम स्कंद [

हरिदाससुतात्मज गोविंद यांची ओवीबद्ध टीका अध्याय ३१ पर्यंत प्रथमाध्यायापासुन आहे. नंतर ६१ व ६२ असे २ अध्याय आहेत. अपूर्ण आहे. काळाचा लेखकाचा उल्लेख नाहीं.

१९७५ ] २४ छांदोग्योपनिषत्सूत्रभाष्य [२१०

ही एक संस्कृत पोथी अति बारिक अक्षराची आहे. अक्षरें स्पष्ट आहेत. एकसारख्या दोन ओळी कि वाचवत नाहीत. इतके बारिक अक्षर असुन ओळी जवळ जवळ आहेत. पोथीचे शेवटीं शकाच्या आकड्यातले पहिले १५ हे आकडे दिसतात. पुढचे आकडे उमगत नाहीत. भाद्र. शु॥ ८ साधारण संवत्सरे संपूर्ण. श्री मदानंद तीर्थ भगवत्पादाचार्य विरचित छां. उ. भाष्यं टीकायां. जयतीर्थकृत अशा अक्षरें लागलीं. ग्रंथ संपूर्ण आहे. बारिक लेखाचा नमुना म्हणून प्रदर्शनात ठेवण्यासारखी पोथी आहे. आकार ११" × ३"

१९७६ ] २५ वेदस्तुती [

भागवताच्या दशम स्कंदातील वेदस्तुतीवर ओवीबद्ध निजानंद सुत यांची टीका समग्र आहे. अक्षर सुंदर आहे. काळ लेखक यांचा उल्लेख नाहीं.

१९७७ ] २६ पंचीकरणवार्तिक [१००

संस्कृत पोथी आचार्यांचे शिष्य सुरेश्वराचार्य यांनीं केलेलें पंचीकरण वार्तिक पत्रे ३१ सुंदर अक्षर वेदान्तपर ग्रंथ आहे संपूर्ण आहे.

१९७८ ] २७ युक्ति नहीं बुद्धि नाहीं करुणाष्टक [

एकच कोणी उतरलेले आहे.

१९७९ ] २८ मंत्रमहोदधि [

संस्कृत ग्रंथ. पत्रें १६६ संपूर्ण. महीधर विरचित. यांत षटकर्माचें निरूपण आहे. याच २५ तरंग आहेत. शके १७७६ काशी संवत्सर आषाढ कृ० १० समाप्तोऽयं ग्रंथ. हस्ताक्षर त्रिंबकशोपनामक देवमन वैद्य यांच. अक्षर सुंदर आहे. ग्रंथ संख्या ३२८५

१९८० ] २९ चित्सुधानंदलहरी [ २००

पोथी. रंगनाथकृत भगवद्गीतेच्या १८ हि अध्यायावर ओवीबद्ध टीका. हे रंगनाथ मोगरे ग्रामाचे रंगनाथ यांच्या वडिलांचे नांव आपराज आजाचे नांव अनन्त. गुरु परंपरा वासुदेव सरस्वती— श्रीकृष्णानंद रंगनाथ. वर्ष पंचदश त्रिगळ्ळणन कीळकाभिधान संवत्सराचे आश्विन शु० ८ गुरुवार नाशिकक्षेत्रीं ग्रंथ लिहिला. गोदावरीचे उत्तरतीरीं. जीर्ण ग्राम महानगरी पार्थिवनाम संवत्सरी भाद्र. शु० १ गुरुवारी समाप्ति पुरी ग्रंथाची. हा ग्रंथ परोपकारार्थ स्वहस्ते लिहिला. रघुनाथ संपूर्ण ग्रंथ आहे.

१९८१ ] ३० समर्थकृत पञ्चीकरण [ १५०

पोथी प्राकृत. पत्रें ८ ओवीबद्ध. पोथीच्या बाजूस टीपा आहेत. कोष्टकें आहेत. अक्षर सुंदर आहे.

१९८२ ] ३१ बोधचंद्रिका लघुटीका [ १५०

दिगंबरानुचर यानीं केलेली गीतेच्या अध्यायावर ओवीबद्ध टीका फक्त १६ व १७ एवढे दोन च अध्याय. अपूर्ण अक्षर चांगलें पत्रें ३५+३३

१९८३ ] ३२ सूक्ष्मवाणी ा १ पान [ १५०

१) ओमित्येकाक्षरं ब्रह्म (२) सर्वतः पाणिपादं ३) स्थाने हृषी० (४) कविंपुराणं (५) ऊर्ध्वमूल० ६) सर्वस्य चाहंहृदि (७) मन्मना० भवमद्भक्तो

४

१९८४ ] ३३ भगवद्गीतासार [ १७५

ज्ञानेश्वरांचे १८ अध्यायावर मराठी ओव्या.

१९८५ ] ३४ चतुर्थ योग [ १५०

समर्थांचे प्राकृत ओव्यांचें प्रकरण. ओव्या १०० पत्रें ९

१९८६ ] ३५ सदाचार प्रकरण [ २००

शंकराचार्यांचे— निस्यानंदानुचर शिवकल्याणकृत असे अखेरीस आहे. पत्रे ८ उत्तम अक्षर

१९८७ ] गर्भगीता टीका [ २४३

केशवनाथानीं केलेली. ते मरकी गावचे. शके १६३० माघ कृ. १०

१९८८ ] ३७ करुणामृत [ २००

देवीदासांचे. ओवीबद्ध अशुद्ध लिहिलें आहे.

१९८९ ] ३८ स्वर्गारोहण पर्वांतील पत्रें ५ [ २००

विष्णुदास नामाच्या सप्तम प्रसंगाची पानें शके १६११

१९९० ] ३९ हरतालिका व्रत [

संस्कृत पोथी. पत्रें १० अशुद्ध लेखन. नागेश बापू भट आत्मज. अमर्दकग्रामनिवासी उपनाम काकडे.

१९९१ ] ४० हस्तामलक [ १५०

यावर संस्कृत टीका तत्वबोधिनी नावाची पत्रें ९ लांबट.

१९९२ ] ४१ अज्ञानोपदेश [ २००

आचार्यांचा. पत्रे २२ अक्षर सुंदर. बाजूला टीपाहि आहेत.

१९९३ ] ४२ महावाक्य विवेक [ १५०

पंचदशींतील पाचव्या प्रकरणाची टीका आहे. पंचप्रकरणी असें या पोथीचें नांव आहे.

१९९४ ] ४३ हनुमान कवच [ १२५

संस्कृत लहान ८ पत्रांची पोथी.

१९९५ ] ४४ रामसहस्रनाम २ पोथ्या [ १५०

अक्षर सुंदर आहे.

१९९६ ] हनुमन्सहस्रनाम पोथी [ १२५

१९९७ ] ४६ उभें शिवलेलें लहान बाड [

यांत सुरवातीस २२ विषयांची अनुक्रमणिका आहे. नानासाहेब शिंदे व होळकर यांचे लढाईचा मजकूर मोडींत लिहिलेल्या ८ पानांवर आहे. कांहीं आरत्या व सुदाम चरित्र आहे.

१९९८ ] ४७ भावार्थ रामायणाचीं कांहीं पत्रें. [

अयोध्याकांडाचीं शेवटचीं पत्रें शके १६०६ माघ शु॰ १० उपेन्द्र स्वामीचें शिष्य दत्तात्रय त्रिमळ राघोजी मल्हार यांचे हस्ताक्षर

१९९९ ] ४८ स्वात्मानुभव [ १८२

ज्ञानेश्वराचें-संपूर्ण-पत्रें १३ शके १६९१ मार्ग॰ कृ॰ १४ शनिवार देवमल्ल त्रिवाडी-हस्ताक्षर.

२००० ] ४९ वाममार्ग [ १००

ही एक ३९ पत्रांची पोथी आहे. अशुद्ध आहे. (

२००१ ] ५० अर्गला स्तोत्र ( १५०

देवी कवच आहे पत्रें ६ आहेत.

२००२ ] ५१ योगिनी दशा [ १५०

ज्योतिषाची पोथी. महांच्या दशा सांगितल्या आहेत. पत्रें १९

२००३ ] ५२ रामरक्षाटीका [ १५०

संस्कृत पोथी. पत्रें एकच पान.

२००४ ] ५३ विवाह पटल [ १००

संस्कृत पोथी. शके १६९९ चै. कृ० १२ पत्रें ३२

२००५ ] ५४ मुहूर्त तत्व [

पोथी संस्कृत शके १७०४ माघ व० १० केशव दैवज्ञ विरचित.

२००६ ] ५५ अद्वैत पंचविंशती [ १५०

पद्मनाथ याचे प्राकृत २५ सुंदर श्लोक आहेत. अद्वैतपर आहेत. पत्रें ५

२००७ ] ५६ सुखबोध [ ८०

या प्राकृत पोथींत कर्म करण्यास शुभ मुहूर्त कोणते याची माहिती आहे. शके १६९९ श्रावण शु. २ समाधान ब्राह्मणेन लिख्यते.

२००८ ] ५७ कोकिळामाहात्म्य [

संपूर्ण पोथी पत्रें ४०

२००९ ] ५८ क्रियाकलाप [ १५०

संस्कृत पोथी विजयानंद अगर विद्यानंद यांची श्लोक-आर्याबद्ध आहे. क्रियापदाचा एकच अर्थ होत असतो पण तीं कोठें काय अर्थानें वापरावींत याचें विवेचन आहे ग्रंथ महत्वाचा आहे. ग्रंथकार म्हणतात. पूर्व पूर्व कवि प्रणीत विविध ग्रंथेषु दृष्ट स्तन्मे निर्गितो हृदये निरूप्य

निपुणं ये धातु पारायणं धातुनां तनु धीरपिंग्यरचयन...... विद्यानंद कविर्विनुग्व हृदय कायस्थ वंशोद्भव व्युत्पांचे वसंग्यकृत प्रवरै...... भेद मुदीक्षणीयं धात्वर्थ तन्मात्र निरूपणेन इमा प्रत्यक्ष पीयूष समृद्धि मधुरा क्रिया धीराणामुपयोग संतु.

२०१० ] ५९ विवाह वृंदावन [

२०११ ] ६० मुहूर्त चिंतामणी [ १७१

शके १७०२ अश्विन व॥ १०

२०१२ ] ६१ समरसा टीका [ १६७

पोथी संस्कृत विषय ज्योतिषाचा आहे. संपूर्ण आहे- पत्रें ३४ रामवाजपेयी कृत शके १७०६ आषाढ शु॥ ७

२०१३ ] ६२ नक्षत्रचूडामणी [ १७०

संस्कृत पोथी. ज्योतिषावर- शके १७०३ माघ शु. २ लेखक समाधान दुबे.

२०१४ ] ६३ रंगनाथी टीका १८ अध्यावर [ ६०

पोथी. ओवीबद्ध प्राकृत टीकेची. पृष्ठें १८६ अक्षर चांगलें ग्रंथाचें लेखन वऱ्हाडातील दारव्हे येथे शके १८१२ त झालें. ग्रंथ संपूर्ण आहे. हे मोगरेकर रंगनाथ होत.

२०१५ ] ६४ मंत्रमहोदधि [

संस्कृत पोथी. महिधराचार्य विरचित. शके १७०६ श्रावण कृ. १ हस्ताक्षर त्रिवाड्योपनामक देवमन वैद्य.

२०१६ ] ६५ राधार्चनचंद्रिका [ १५०

संस्कृत पोथी. रामदासानुचरण रामचंद्र नाम्ना लिखिता. ग्रंथ संख्या ११४० संपूर्ण आहे.

२०१७ ] ६९ अमृतानुभव [ २५०

जुनी पोथी. प्रथमचीं ३ च प्रकरणें आहेत. अपूर्ण.

२०१८ ] तत्वअनुभव-व्यतिरेक पंचीकरण [ २३७

प्राकृत पोथी. पत्रें ७४ संपूर्ण. ओंव्या ८१७ शके १६३६ जयसंवत्सर. भाद्र. शु. ७ पुस्तकं गुंजाळा केशवंतेडु. कारंजे याचें. हस्ताक्षर वासुदेव हरि.

२०१९ ] व्यंकटगिरिमहात्म्य [ ७३

प्राकृत पोथी शके १७२९ कार्तिक व॥ ८

२०२० ] अंतर्भाव [ १५८

समर्थांचा, शके १७१५ आश्विन व. ९

२०२१ ] ७० स्वात्मानुभव [ ३४२

प्राकृत ओवीबद्ध ग्रंथ. हरीदास सुत कान्हा अश्वलायन शाखा. बोपा चिल्लाळ यास ३ मुलगे (१) चिल्लाळ (२) विठ्ठल (३) कान्हा बिल्वखेटगांवचे शके १५३१ का. शु. १२ ग्रंथ संपूर्ण झाला. इदं पुस्तकं देवदानुचरेण आनंदेन लिखितम्

२०२२ ] ७१ भावार्थ रामायण [ २५०

नाथांच्या रामायणापैकीं फक्त बालकांड आहे. संपूर्ण आहे. पत्रें २५१ आहेत.

२०२३ ] ७२ सभापर्व मुक्तेश्वरांचें [ २५०

गोदावरीतट निवासी । अत्रिगोत्रीक पवित्र ऋषि ।
चिंतामणी गुणैक राशी । पासाव जन्म जयाचा ।
तो मुद्गल चिंतामणी सुत विश्वंभर जगविख्यात ।
व्यास भारतीचा अर्थ । महाराष्ट्रें बोलिला ।

अशी या पर्वाअखेर ओवी आहे.

२०२४ ] ७३ विवेकसार [ १७३

संस्कृत ग्रंथ. वासुदेवेंद्र विरचित् विवेकसाराख्यम् ग्रंथाला अनुक्रमणिका आहे. १६ वर्णक आहेत. एकंदर पत्रें २७५ आहेत. अक्षर ठसठशीत सुंदर. कागद जाडा आहे. वेदांत विषय आहे. शके १७००विळंबी संवत्सर चैत्र व॥ १२ ग्रंथ समाप्त.

२०२५ ) ७४ अवधूतराज ( २३७

दिगंबरदूत विरचित अवधूतराज नामग्रंथांतील सांख्य महावाक्य विवरणांतील तत्पदार्थ निरोपण नांवाचें दाहावें प्रकरण. शके १६३६ जय संवत्सर फा. शु. १० पुंजासाकेसादेडु वास्तव्य करंजे हस्ताक्षर वासुदेव हरी.

२०२६ ] ७५ उपदेश रहस्य [

प्राकृत ओवी बद्ध. विश्वनाथ विरचित. संपूर्ण पत्रें ११२ विद्यारण्यांनीं ' जीवन्मुक्त ' प्रकरण लिहिलें त्याचे आधारें या ग्रंथाची रचना केली आहे. कृष्णानंदाचे शिष्य रंगनाथस्वामी कपिल गोत्री नाशिकचे त्यांचा शिष्य विश्वनाथ.

२०१७ ७६ भावार्थ रामायण किष्किंधाकांड [ २५०

कांड संपूर्ण आहे.पोथीचीं पानें २०३ आहेत.शक वगैरे नाहीं.

२०२८ ) ७७ हस्तामलक टीका ( ३००

पोथी फार जीर्ण झाली आहे. कडा तुटत आहेत. अशुद्ध उतरली आहे. ' यादृश्यं पुस्तकं दृष्टं ' या ऐवजीं ' यादासे पुस्तकं दृष्टवा. ' असें उतरलें आहे. हस्ताक्षर भुजंगशेठ तोडकरी धाराशिव. पुस्तकें संबया गोसावी धर्म वा॥ साडेगांव

२०२९ ) ७८ तत्वानुभावसार ( १५०

पोथी अपूर्ण आहे.

